**सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा रु. ३० कोटी निधी वितरीत करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्र. : कृयांयो-२०२२/प्र.क्र.२० (भाग-२)/१४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२.

दिनांक : २५ मार्च, २०२२.

**संदर्भ :**

१. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P) दि. १० जानेवारी, २०२२
२. आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्र. कृआ/गुनि-५/नक्र १४७/२०२१-२२/१५२०/२०२२ दि.१४ जानेवारी, २०२२
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कृयांयो-२०२२/प्र.क्र.२०(भाग-१)/१४-अे दि१७ जानेवारी, २०२२
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र. २७/ अर्थसंकल्प (विघयो) दि. २४ मार्च, २०२२

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्रांची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १०० टक्के आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधी हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे

केंद्र शासनाने दि. १० जानेवारी, २०२२ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्श्याचा रु. ९१४८.१६ लक्ष निधी वितरित केला आहे. सदर निधीतील अनुसूचित जाती प्रवर्गाच्या केंद्र हिश्श्याच्या रु. १८ कोटी निधीस समरूप राज्य हिश्श्याचा रु. १२ कोटी असा एकूण रु.३० कोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

**१.** या शासन निर्णयान्वये, कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानांतर्गत अनुसूचित जाती प्र वर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रु. १८ कोटी (रुपये अठरा कोटी फक्त) व त्या समरूप राज्य हिश्श्याचा रु. १२ कोटी (रुपये बारा कोटी फक्त) असा एकूण रु.३० कोटी निधी (रुपये तीस कोटी फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

**२.** सदर वितरीत रु. ३० कोटी निधीसन २०२१-२२ मध्ये खालील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमाक: एन-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७८९ अनुसूचित जाती उप योजना<br>(०१)(११) कृषि उन्नती योजना- कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो)<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१बी१८८),<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमाक: एन-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७८९ अनुसूचित जाती उप योजना<br>(०१)(११) कृषि उन्नती योजना- कृषि यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो)<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१बी१९७),<br>३३ अर्थसहाय्य |

**३.** या उप-अभियानाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने वार्षिक कृति आराखड्यात मंजूर केलेल्या बाबींवर खर्ची टाकावा तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांना महा-डीबीटी प्रणालीद्वारे आधार संलग्न बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

**४.** उपलब्ध निधी अनुसूचित जाती प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

**५.** सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लक्ष यापैकी जे कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लक्ष यापैकी जे कमी असेल ते याप्रमाणे अनुदान देण्यात यावे.

**६.** इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तींचे व संदर्भ क्र. १ व ३ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

**७.** सदर वितरित केलेला निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत आहे:-

**८.** हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. १८३/व्यय-१४, दि.१० मार्च, २०२२ तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भाधीन दि२४ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२५१२४२१८७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.03.25 12:43:24 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई,
३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
५. अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई,
६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई,
७. सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे,
१०.विभागीय कृषि सह संचालक (सर्व),
११.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व),
१२.महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई,
१३.प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१४.प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१७.वित्त विभाग ( व्यय-१४ ), मंत्रालय, मुंबई,
१८. निवडनस्ती.